**ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ च्या तरतूदीनुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदी श्री.किसन मारुतीराव लवंदे यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. नियुक्ती-२०१८/प्र.क्र.११८/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- २३ ऑक्टोबर, २०१८

**वाचा:-** १) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २०००
२) शासन निर्णय क्र. - नियुक्ती-२०१८/प्र.क्र.५०/ग्रा.सं.४, दि.१८.०५.२०१८.
३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.- राआ/महा./आस्था-३/राआ-सदस्य-भरती/२०१८/४२, दि.०१.०८.२०१८.

**प्रस्तावना :-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या तरतुदीनुसार ग्राहकांच्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी राज्यामध्ये राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदी श्री.सुधीर माणिकराव खानापुरे यांची संदर्भ क्र.२ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती. परंतु, श्री.सुधीर माणिकराव खानापुरे सदर पदावर अद्याप रुजू न झाल्याने या पदावर राज्य आयोगाच्या शिफारस यादीतील पुढील क्रमांकाचे उमेदवार श्री.किसन मारुतीराव लवंदे यांची नियुक्ती करण्याबाबत राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाने संदर्भ क्र.३ अन्वये सादर केलेली शिफारस शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या कलम १६ (३) अन्वये श्री.किसन मारुतीराव लवंदे यांची, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्य पदी (Non-Judicial Member) खालील अटींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) श्री.किसन मारुतीराव लवंदे यांची गैर न्यायिक सदस्य पदी नियुक्ती प्रथम ५ वर्षांसाठी किंवा त्यांच्या वयाची ६७ वर्षे पूर्ण होई पर्यंत किंवा पुढील आदेशापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत करण्यात येत आहे.

२) त्यांनी सदर पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून त्यांचा १ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी (Probation Period) राहील.

३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्य यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० च्या नियम ७ मधील पोटकलम १ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार वेतन व भत्ते अनुज्ञेय राहतील.

४) त्यांच्या सेवाविषयक बाबी ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० व त्यामधील सुधारणेनुसार राहतील.

५) महाराष्ट्र ग्राहक सरंक्षण नियम, २००० मधील ७(४) व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्यांना पदावरून दूर करता येईल.

६) शासनाला आवश्यक वाटल्यास, संबंधित गैरन्यायिक सदस्याच्या सेवा बदली योग्य असतील किंवा कामाचा भार किंवा प्रलंबित प्रकरणे विचारात घेऊन, लोकहितास्तव किंवा प्रशासकीय कारणास्तव राज्य आयोगाच्या शिफारशीनुसार अन्य परिक्रमा खंडपीठामध्ये त्यांच्या सेवेचा उपयोग शासन करुन घेईल.

७) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे गैर न्यायिक सदस्य आयोगाच्या कामासाठी दौऱ्यावर असताना राज्य शासनाच्या प्रथम श्रेणी अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेला प्रवास व दैनिक भत्ता मिळण्यास पात्र असतील. परंतु, त्यांना विमानप्रवास तसेच, वातानुकूलित प्रथम वर्गाचा रेल्वे प्रवास अनुज्ञेय राहणार नाही.

८) संबंधित गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती वैद्यकीय तपासणी व पोलीस पडताळणी अहवालाच्या अधीन राहून करण्यात येईल. ज्यांचे वैद्यकीय व पोलीस पडताळणी अहवाल योग्य नसतील/त्यामध्ये काही प्रतिकुल शेरे नमूद केलेले असतील अशा संबंधित गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

९) सदर गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती त्यांनी विहित नमुन्यातील शपथपत्र व हमीपत्र लिहून दिल्यानंतर व त्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यांनतर प्रभावी होईल. याबाबतचा रुजू अहवाल राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगास व शासनास संबंधित गैर-न्यायिक सदस्याने सादर करावा.

१०) गैर न्यायिक सदस्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत त्यांनी पदभार न स्विकारल्यास त्यांची नियुक्ती आपोआपच रद्दबातल होईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

२. उपरोक्त बाबींसाठी होणार खर्च, मागणी क्र.एम-२ "२४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१) ०१" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८१०२४१६३००७२४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raju Kalluji Narpande

Digitally signed by Raju Kalluji Narpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c9bb69da44e8b03c93d1a880163547bbb4787f2f2839b6277a288182cbf623cb, cn=Raju Kalluji Narpande
Date: 2018.10.24 16:35:53 +05'30'

**( राजू क. नरपांडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
५) प्रधान सचिव, (विधी व न्याय), मंत्रालय, मुंबई
६) अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे स्वीय सहायक .
७) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
८) सह सचिव, ग्रा.सं.४ (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.).
९) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
१०) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) श्री.किसन मारुतीराव लवंदे, गैर न्यायिक सदस्य, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१५) निवडनस्ती, ग्रा.सं.-४.